**मोबाईल जामर या उपकरणाचे विनिर्देश तयार करुन देण्याच्या खर्चास मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः जेएलएम-१०१३/प्र.क्र.३२८/तुरुंग-२**
जागतिक व्यापार केंद्र, सेंटर नं. १, ३० वा मजला,
कफ परेड, मुंबई-४०० ००५.
दिनांक: १७ ऑक्टोबर, २०१४.

**वाचा**

१) अपर पोलीस महासंचालक व कारागृह महानिरीक्षक यांचे पत्र क्र. मेन्टेनन्स /सुरक्षाव्यवस्थेत वाढ/१०४७८, दिनांक २७.११.२०१३.
२) शासन निर्णय, गृह विभाग, क्र.जेएलएम १३१४/प्र.क्र.८६/तुरुंग-२, दि.१०.०३.२०१४.

**प्रस्तावना**

राज्यातील कारागृहातील सुरक्षा व्यवस्थेत वाढ करण्याकरिता लागणारे उपकरण संच खरेदी करणे याअंतर्गत राज्यातील कारागृहामध्ये एकुण २७५ नग मोबाईल जामर उपकरणे खरेदी करण्यास उपरोक्त वाचा २) येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. मोबाईल जामर उपकरण खरेदी करताना तसेच यंत्रणेची निवड, दर्जा, क्षमता याबाबत मोबाईल जामर उपकरणाचे विनिर्देश (Specification) करण्याकरिता कॉलेज ऑफ इंजिनिअरिंग, पुणे या संस्थेची सल्लागार म्हणून नियुक्ती करण्यात आली होती. कॉलेज ऑफ इंजिनिअरिंग, पुणे या संस्थेच्या सदस्यास तांत्रिक सल्लागार नियुक्त करुन मोबाईल जामर या उपकरणाचे विनिर्देश तयार करुन देण्याकरिता रुपये २ लक्ष आणि मोबाईल जामरच्या प्रात्यक्षिकाकरिता दिलेल्या तीन स्थानिक व्हिजीटकरिता (प्रती व्हिजीट रुपये १,०००/- या प्रमाणे) रुपये ३,०००/- अशी एकुण रुपये २,०३,०००/- इतकी रक्कम अदा करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

कॉलेज ऑफ इंजिनिअरिंग, पुणे या संस्थेच्या सदस्यास तांत्रिक सल्लागार नियुक्त करुन मोबाईल जामर या उपकरणाचे विनिर्देश तयार करुन देण्याकरिता रुपये २ लक्ष आणि मोबाईल जामरच्या प्रात्यक्षिकाकरिता दिलेल्या तीन स्थानिक व्हिजीटकरिता (प्रती व्हिजीट रुपये १,०००/- या प्रमाणे) रुपये ३,०००/- अशी एकुण रुपये २,०३,०००/- इतकी रक्कम अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. यावरील होणारा खर्च सन २०१४-१५ या वित्तीय वर्षात लेखाशीर्ष मागणी क्र. बी-५ मुख्य लेखाशीर्ष २०५६, तुरुंग (योजनेत्तर),(००) (००१) संचालन व प्रशासन, (००)(०१) कारागृह महानिरीक्षणालय, दत्तमत (२०५६ ००२६), १३, कार्यालयीन खर्च या लेखाशीर्षाअंतर्गत उपलब्ध होणाऱ्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ४६३/१४/व्यय-८, दिनांक-११.०९.२०१४ नुसार प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०१४१०१७१६५०२४५५२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ravindra Ishwar Giri

Digitally signed by Ravindra Ishwar Giri
DN: CN = Ravindra Ishwar Giri, C = IN, S = maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = HOME
Date: 2014.10.21 10:47:01 +05'30'

**( र. ई. गिरी )**
कार्यासन अधिकारी, गृह विभाग.

प्रत,

१. अपर पोलीस महासंचालक व कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे,
२. कारागृह उपमहानिरीक्षक (मुख्यालय) , महाराष्ट्र राज्य, पुणे,
३. महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य १ मुंबई,
४. महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य १ मुंबई,
५. महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य २, नागपूर,
६. महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य २, नागपूर,
७. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,
८. अवर सचिव (बीयुडी-१), गृह विभाग,जागतिक व्यापार केंद्र,सेंटर नं.१, ११ वा मजला कफ परेड, मुंबई -४०० ००५,
९. कार्यासन अधिकारी, व्यय-८, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई -३२,
१०. निवड नस्ती (तुरुंग-२).